पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या बदल्यांना मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२३६/पोल-१.

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.

दिनांक : २८ जून २०२३.

संदर्भ :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बदली-२०२३/प्र.क्र.३२/कार्या.-१२, दिनांक ३०.०५.२०२३.

**प्रस्तावना-**

*"महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५"* यामधील तरतुदींनुसार राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या दिनांक ३१ मे २०२३ पर्यंत करावयाच्या सर्वसाधारण बदल्या करण्यास, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बदली-२०२३/प्र.क्र.३२/कार्या.-१२, दिनांक ३०.०५.२०२३, द्वारे दिनांक ३० जून २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. त्याच धर्तीवर, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) यामधील तरतुदींनुसार करावयाच्या महाराष्ट्र पोलीस दलातील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्या करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) यामधील तरतुदींनुसार ३१ मे २०२३ पर्यंत करावयाच्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्या करण्यास दिनांक ३० जून २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०५१८०००६६९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2023.07.05 18:10:03 +05'30'

**( व्यंकटेश भट )**

शासनाचे सह सचिव.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान भवन, मुंबई.

५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
६) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/ठाणे शहर.
८) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक.
१२) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३) अवर सचिव, पोल-१अ, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी, पोल-५ब, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती, पोल-१.